First Administrative Approval to the Sina Madha Lift Irrigation Scheme Taluka Madha District Solapur

**सीना माढा उपसा सिंचन योजना**
**ता.माढा जि.सोलापूर**
**प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सीना माढा/०३०९/(१६७/०९)/मोप्र १
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २३ सप्टेंबर, २०११

पहावे :- १) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. सीना माढा १०८९/२१३/८९ ज.स.अ.मंत्रालय, मुंबई दि. १७.०५.१९९४ व दि. ६.८.१९९४
२) कार्यकारी संचालक मकृखोविमं पुणे, यांचे पत्र क्र. मकृखोविमं/२००३/(४४/२००३) /सुप्रमा/मोप्र-३/१३७३ दि. २४ फेब्रुवारी २००९
३) शासन परिपत्रक क्र.सुप्रमा-०४११/(२६२/२०११)/मोप्र-१, दि.१०.०८.२०११

**प्रस्तावना :-** सोलापूर जिल्हयातील सीना माढा उपसा सिंचन योजनेस उपरोक्त संदर्भ क्रं.१ येथील शासन निर्णयान्वये रु. ५४.४९ कोटी (रु. चोपन्न काटी एकोणपन्नास लक्ष फक्त) एवढया किंमतीस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि पुरेशा निधीच्या उपलब्धतेअभावी प्रकल्प वेळेत पूर्ण होऊ शकला नाही. त्यामुळे दरसूचीतील वाढीमुळे तसेच व्याप्तीतील बदल, भूसंपादन वाढीमुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ झाली. त्यामुळे प्रकल्पाच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय आहवालास मान्यता प्रदान करण्यासाठी प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-** सोलापूर जिल्हयातील सीना माढा प्रकल्पाच्या कामासाठी सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारीत रुपये ३००.०४ कोटी (तीनशे कोटी चार लक्ष फक्त ) एवढया रकमेस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु. २३९.३९ कोटी (दोनशे एकोणचाळीस कोटी एकोणचाळीस लक्ष ) कामाप्रित्यर्थ व रु. ६०.६५ कोटी (रुपये साठ कोटी पासष्ट लक्ष ) अनुषंगीक खर्च आहे. सोबत विवरणपत्र **अ** मध्ये सुधारीत उपशीर्षवार तरतूद दिली आहे.

१) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारीत प्रशासकीय मान्यतेमधील तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२) या प्रकल्पामुळे सोलापूर जिल्हयातील, माढा तालुका येथील १६१५० हे. एवढया क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.५५ आहे.

३) या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५ ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील

गुंतवणूक (०२) / (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) ( ४७०१ — एच ६२९ ) सीना माढा मोठे प्रकल्प या खाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४) हा निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. १२२/का.१४३४, दि. ०४/०६/११ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १५४/व्यय-१२ दि. ०५/०७/११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करणेत येत आहे. सदर निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२३१६२९००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(रा. र. शहा )**
शासनाचे उप सचिव

सहपत्र : वरीलप्रमाणे : अ,
प्रत : सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
स्वीय सहायक, मा. मंत्री (जलसंपदा)(कृ खो पा वि महामंडळ) मंत्रालय,मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय,मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा),मंत्रालय,मुंबई
स्वीय सहायक, सचिव,(लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे,
मुख्य अभियंता (कृपातंल) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे,
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे.
कार्यकारी अभियंता, सीना माढा प्रकल्प विभाग, भिमानगर.
अवर सचिव (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय,मुंबई,
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई,
कार्यासने- जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
निवड धारिका मोप्र-१

**विवरणपत्र "अ"**

शासन निर्णय क्रमांक : सीना माढा/०३०९/(१६७/०९)/मोप्र १, दिनांक २३ सप्टेंबर,२०११ चे सहपत्र

सीना माढा उपसा सिंचन योजना ता.माढा जि.सोलापूर

प्रथम सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी

| अ.क. | उपशिर्ष | सुधारीत प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | अे- प्राथमिक सर्वेक्षण | ९२.०९ |
| २ | बी- भूसंपादन | ९१७.०६ |
| ३ | सी- कामे | ११०५६.९९ |
| ४ | डी-विमोचक | १२७.९८ |
| ५ | इ- फॉल्स | ०.०० |
| ६ | एफ- आरएचटी कामे | ६५८.४४ |
| ७ | जी- ब्रिजेस | ३२३.५८ |
| ८ | एच- एस्केप | २०.४१ |
| ९ | के- इमारती | १४८.५१ |
| १० | एल- मातीकाम | ३३०५.४९ |
| ११ | एम- वृक्षारोपन | ५०.२१ |
| १२ | ओ- संकिर्ण | ९२६.२५ |
| १३ | पी- देखभाल दुरुस्ती | २७१.०६ |
| १४ | क्यु- हत्यारे व सयंत्रे | ५२.०७ |
| १५ | आर- दळणवळण | १३८.७५ |
| १६ | यु- वितरिका | ५८४९.८७ |
| १७ | व्ही- वॉटर कोर्सेस | --- |
| १८ | एक्स- पर्यावरण | --- |
| १९ | वाय- साठ्यावरील तूट | --- |
| २० | उपसा सिंचन | --- |
| | एकुण कामा प्रित्यर्थ | २३९३८.७६ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ६०६५.४४ |
| | **एकुण** | **३०००४.२०** |
| | **म्हणजे रुपये** | **३००.०४ कोटी** |